**ई-कोर्ट प्रकल्पांतर्गत राज्यातील न्यायालयांना पुरविण्यात आलेल्या WAN Connectivity करिता येणाऱ्या आवर्ती खर्चासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.३५/२२/प्रशा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई :- ४०० ०३२,
दिनांक :- २७ मार्च, २०२३

<u>वाचा</u>:-१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.वॅन-२०२१/प्र.क्र.१८/कार्या.०७, दि.२५.२.२०२२

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक-२०२२/प्र.क्र.९६/अर्थ-३, दि.३ डिसेंबर,२०२२

३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.३५/२२/प्रशा-५, दिनांक ०६.०२.२०२३

४) शिक्षण आयुक्तालय यांचे पत्र क्र. अंदाज-१८१/ निविप्र/२२-२३/३०२ दिनांक २१.२.२०२३

**<u>प्रस्तावना</u>** :-

विधि व न्याय विभाग, शासन निर्णय दिनांक २५.२.२०२२ अन्वये ई-कोर्ट प्रकल्पांतर्गत जिल्हा न्यायालये आणि दुय्यम न्यायालयांच्या संगणकीकरणाचा कार्यक्रम केंद्र शासनाकडून हाती घेण्यात आला आहे. ई-कोर्ट मिशन मोड प्रकल्प भाग-२ अंतर्गत राज्य शासन व केंद्र शासन यांच्या दरम्यान करण्यात आलेल्या सामंजस्य करारानुसार ई-कोर्टस प्रकल्पाच्या अनुषंगाने दोन वर्षानंतरच्या पुढील कालावधी करिता येणाऱ्या आवर्ती खर्चासाठी निधी उपलब्ध करुन देणे अनिवार्य आहे. त्याकरिता बीएसएनल/एमटीएनएल यांना सन २०२१-२२ व सन २०२२-२३ या दोन वर्षाकरिता ९ शाळा न्यायाधिकरणासाठी एकूण रु. ८५,१०,४७०/- इतक्या रकमेची मागणी आयुक्त शिक्षण यांच्याकडून करण्यात आली होती. मात्र, त्याकरिता अर्थसंकल्पीय तरतूद उपलब्ध नसल्याने पुरवणी मागणी मंजूर करण्याची विधानमंडळास विनंती करण्यात आली होती. विधानमंडळाकडून पुरवणी मागणीव्दारे मान्य केलेला निधीपैकी ५०% निधी संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. उर्वरित निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

शालेय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील ९ शाळा न्यायाधिकरणासाठी ई- कोर्ट मिशन मोड प्रकल्पांतर्गत केंद्र शासन, राज्य शासन व उच्च न्यायालय यांच्यामध्ये त्रिपक्षीय सामंजस्य करारानुसार ई- कोर्टस् प्रकल्पाच्या अनुषंगाने WAN Connectivity साठी पुरवणी मागणीव्दारे मंजूर झालेल्या रु. ८५,१०,४७० इतक्या निधी पैकी ५०% म्हणजे रु.४२,५५,२३५

(रुपये बेचाळीस लाख पंचावन्न हजार दोनशे पस्तीस फक्त ) इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. उर्वरित ५०% म्हणजे रु.४२,५५,२३५ (रुपये बेचाळीस लाख पंचावन्न हजार दोनशे पस्तीस फक्त ) निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्याअनुषंगाने ई-०२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८० सर्वसाधारण, ८००, इतर खर्च (०३) न्यायाधिकरणे (०३) (०१) शाळा न्यायाधिकरणे (२२०२१६१६) अंतर्गत ०६-दूरध्वनी, वीज व पाणी" या लेखाशीर्षाअंतर्गत वितरीत करण्यात येत आहे. खालील कोष्टकातील स्तंभ क्र. ६ मध्ये नमूद केल्यानुसार निधी वितरणाबाबतची पुढील आवश्यक ती कार्यवाही आयुक्त (शिक्षण) यांच्या स्तरावरुन तात्काळ करण्यात यावी.

| अ. क्र. | शाळा न्यायाधिकरणाचे नाव | वार्षिक आवर्ती शुल्क (१८%GST सह) | सन २०२१-२२ व २०२२-२३ करीता BSNL/MTNL यांचेकडून प्राप्त झालेल्या देयकानुसार आवश्यक तरतुद (१८%GST सहित | दिनांक ६.२.२०२३ अन्वये वितरीत केलेला निधी | या शासन निर्णयाव्दारे वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | पीठासीन अधिकारी शाळा न्यायाधिकरण, अमरावती | ४९३३३४.४० | ९,८६,६६९ | ४,९३,३३५ | ४,९३,३३४ |
| २ | --"¬कोल्हापूर | ४९३३३४.४० | ९,८६,६६९ | ४,९३,३३५ | ४,९३,३३४ |
| ३ | -"-मुंबई | ४९३३३४.४० | ९,८६,६६९ | ४,९३,३३५ | ४,९३,३३४ |
| ४ | -"-लातूर | ४९३३३४.४० | ८,२१,७७३ | ४,१०,८८६ | ४,१०,८८७ |
| ५ | -"- नागपूर | ४९३३३४.४० | १०,४७,४९१ | ५,२३,७४५ | ५,२३,७४६ |
| ६ | -"- औरंगाबाद | ४९३३३४.४० | १०,३२,६२४ | ५,१६,३१२ | ५,१६,३१२ |
| ७ | -"- नाशिक | ४९३३३४.४० | ६,९७,४२६ | ३,४८,७१३ | ३,४८,७१३ |
| ८ | -"- पुणे | ४९३३३४.४० | १०,०५,५९१ | ५,०२,७९५ | ५,०२,७९६ |
| ९ | -"- सोलापूर | ४९३३३४.४० | ९,४५,५५८ | ४,७२,७७९ | ४,७२,७७९ |
| | एकूण पूर्णांकात | ४४,४४,०१० | ८५,१०,४७० | ४२,५५,२३५ | ४२,५५,२३५ |

२. हा खर्च, सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी ई-०२, २२०२,सर्वसाधारण शिक्षण,८० सर्वसाधारण,८००, इतर खर्च (०३) न्यायाधिकरणे (०३) (०१) शाळा न्यायाधिकरणे (२२०२१६१६) अंतर्गत ०६-दूरध्वनी, वीज व पाणी" या लेखाशीर्षाअंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या सुधारित अंदाजाच्या मर्यादेत आहे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २५४/व्यय-५ दिनांक २४.०३.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२३०३२७१९२३४८२७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TIKARAM WAMAN KARPATE

Digitally signed by TIKARAM WAMAN KARPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=340ec5e34f4f31b01be0869a230e89b14739b1c38b24cff0edd0f8088e0c342a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9395C596B57A69FE04109B8C8191E7389CFF5EDA3FAC16C6F8263BE7FBBD319D, cn=TIKARAM WAMAN KARPATE
Date: 2023.03.28 12:36:43 +05'30'

**( टि. वा. करपते )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१.आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
२.पिठासीन अधिकारी, शाळा न्यायाधिकरण, अमरावती, कोल्हापूर, लातूर, मुंबई, नागपूर, औरंगाबाद, नाशिक, पुणे, सोलापूर
३.सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
४. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
५.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
६. संबधित जिल्हा कोषागार अधिकारी ,
७.अवर सचिव (व्यय-५) वित्त विभाग मंत्रालय, मुंबई
८.निवडनस्ती प्रशा-५.